**शिक्षणशास्त्र महाविद्यालयांचा विकास योजना**
सन २००९-१० करिता खर्चास मंजूरी देणेबाबत..

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र. अर्थसं२००९/(७९/०९)/मशि३
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० डिसेंबर, २००९

पहा : १) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे क्र.अर्थसं/प्रशा२/दिनांक ०६.०५.२००९ चे पत्र.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज१०.०९/प्रक्र१५१/२००९/अर्थसंकल्प३, दिनांक ३० जून, २००९.

**प्रस्तावना** :- वार्षिक योजना सन २००९-१० मध्ये शासकीय महाविद्यालयाचा विकास या योजनेखाली रु.१००.०० लक्ष नियतव्यय मंजूर असून या नियतव्ययातून राज्यातील १२ शासकीय शिक्षणशास्त्र महाविद्यालयांसाठी प्रत्येकी रु. ०२.०० लक्ष असा एकुण रु. २४.०० लक्ष नियतव्यय मंजूर करण्यांत आलेला आहे. त्यापैकी रु. ८.०० लक्ष नियतव्यय सन २००९-१० या आर्थिक वर्षात लेखानुदानाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधी संबंधीत महाविद्यालयांना वितरीत करण्यात आलेला असून त्याची देयके संबंधीत महाविद्यालयांनी कोषागारात सादर केलेली आहेत. उर्वरीत रु. १६.०० लक्ष नियतव्यय माहे जून, २००९ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित झाला असून सदर नियतव्ययातून संगणक, प्रिंटर्स, फर्निचर्स,सोलर वॉटर हिटींग सिस्टीम (महाविद्यालयांतर्गत वसतिगृहांकरिता), ग्रंथालयीन पुस्तके, विविध प्रतिकृती, मल्टीमिडीया प्रोजेक्टर इत्यादी बाबी खरेदी करावयाच्या असल्यामुळे, त्याकरीता येणा-या रुपये १६.०० लक्ष इतक्या खर्चास मंजूरी देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- संदर्भ क्रमांक २ मधील वित्त विभागाच्या परीपत्रकाच्या अनुषगाने सन २००९-१० करिता शासकीय शिक्षणशास्त्र महाविद्यालयाचा विकास या योजनेसाठी रु.१६.०० लक्ष (रुपये सोळा लक्ष फक्त ) इतकी रक्कम खर्च करण्यास शासनाची मंजूरी देण्यांत येत आहे. सदरचा निधी मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्यांत यावा.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक डब्ल्यू -२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण,०२, माध्यमिक शिक्षण ,१०५, शिक्षकांचे प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१) (०२) शिक्षणशास्त्र महाविद्यालयांचा विस्तार (२२०२ ०३२४ ) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व उपरोक्त मंजूर तरतुदीतून भागविण्यांत यावा.

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वित्त विभाग शासन परिपत्रक संदर्भ क्रमांक २ मधील सूचनांनुसार आवश्यक ते पूरक आदेश निर्गमित करावेत व अहवाल शासनास सादर करावा.

४. हे आदेश वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ७००/व्यय-५, दि.१६.१०.२००९ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदरहू आदेश शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यांत आलेला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९१२१०१८२७२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स्वा.अ.बोरसे)
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, उच्च शिक्षण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीय शिक्षण सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२ मुंबई / नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हयांचे कोषागार अधिकारी.
वित्त विभाग (व्यय ५ / अर्थसंकल्प ३), मंत्रालय मुंबई
कार्यासन साशि १, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन - मशि ३)